# स्फूर्तिगीते

(ऑगस्ट क्रांती सुवर्ण महोत्सवाच्या निमित्ताने)




"ऑपरेशन ब्लॅक बोर्ड योजनेखालील पुस्तक – १९९२-९३"

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,
पुणे.

प्रथमावृत्ती : १९७२
सुधारित आवृत्ती : १९९२



**प्रस्तावना**

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून तो क्रमशः अमलात येत आहे. पाठ्यपुस्तकांबरोबरच विदयार्थ्यांना त्यांच्या शालेय जीवनात उपयुक्त ठरेल असे साहित्य उपलब्ध करून देण्याच्या हेतूने पाठ्यपुस्तक मंडळाने सदर स्फूर्तिगीतांचा संग्रह संकलित करून प्रसिद्ध केला आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतली सुधारणा व जोडाक्षर-पद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

पुणे :
२६ जानेवारी, १९७२
माघ ६, १८९३

संचालक
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक
निर्मिती व अभ्यासक्रम
संशोधन मंडळ.

कागद :
६१ x ८६सें.मी.
६० जी.एस्.एम्.
व्हा. प्रिं. पेपर

मुद्रक :
भरत काते
सरस्वती प्रिंटर्स,.
४१५, क्रीएटिव इंड. इस्टेट,
एन. एम. जोशी मार्ग,
मुंबई - ४०० ०११.

मुद्रणादेश :
N/PTG/TB/४५७२
(0·30)

---

महाराष्ट्र शासनाच्या आदेशानुसार 'ऑगस्ट क्रांती सुवर्ण महोत्सवा' च्या निमित्ताने, 'स्फूर्तिगीते' या पुस्तकातील गीते आणि 'या भारतात बंधुभाव नित्य वसू दे!' या पुस्तकातील काही गीते घेऊन 'स्फूर्तिगीते' या पुस्तकाची ही सुधारित आवृत्ती प्रकाशित केली आहे.

पुणे :
दिनांक : १ ऑगस्ट १९९२

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक
निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

प्रकाशक :
श्री. पी. वाय. साळवी
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ
मुंबई - १८

# निवेदन

ऑगस्ट क्रांतीचा सुवर्ण महोत्सव यावर्षी सर्व भारतभर साजरा केला जात आहे. या सुवर्ण महोत्सवानिमित्त महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती आणि अभ्यासक्रम संशोधन मंडळाने काही स्फूर्तिगीतांचे संकलन केले असून ते पुस्तकरूपाने प्रकाशित होत आहे, ही अतिशय आनंदाची घटना आहे.

भारतीय स्वातंत्र्य लढ्याचा संपूर्ण इतिहास हा स्फूर्ती, प्रेरणा, चैतन्य आणि ओजस्विता यांची अमर गाथा आहे. १९४२ च्या ऑगस्ट क्रांतीला तर या संग्रामाचा कलशाध्याय म्हणूनच संबोधले पाहिजे. दिनांक ८ ऑगस्ट १९४२ रोजी मुंबईच्या गवालिया टँक मैदानावर भरलेल्या प्रचंड सभेत राष्ट्रपिता महात्मा गांधी यांनी ब्रिटिश साम्राज्यशाहीला 'चले जाव' चा निर्वाणीचा इशारा दिला आणि स्वराज्याच्या अंतिम प्राप्तीसाठी सर्व भारतीयांनी 'करेंगे या मरेंगे' या वज्रनिर्धाराने उभे रहावे असा आदेश दिला. ८ ऑगस्टच्या त्या रात्री पंडित जवाहरलाल नेहरूंनी हा 'चले जाव' चा ऐतिहासिक ठराव मांडला आणि जवळ जवळ त्याच क्षणी सर्व देशभर अखेरच्या युद्धाची ठिणगी पडली.

जेव्हा सामान्य माणूस अन्याय आणि अत्याचाराच्या विरुद्ध पेटून उठतो तेव्हा प्रबल अशा सत्ताधीशांची आणि साम्राज्यशाह्यांची सिंहासने डळमळीत होतात हा जगाचा इतिहास आहे. ऑगस्ट क्रांतीच्या आंदोलनातून त्याचीच पुनरावृत्ती झाली.

भारतीय स्वातंत्र्याचे आंदोलन ही इतिहासातील एक अलौकिक आणि अभूतपूर्व अशी घटना आहे. सामर्थ्यसंपन्न आणि शस्त्रसज्ज अशा राज्यकर्त्यांच्या समोर आत्मबलावर आणि आत्मनिर्धाराच्या जोरावर नि:शस्त्र अशी माणसे प्रतिकारासाठी उभी राहतात; हालअपेष्टा, अन्याय, अत्याचार सहन करतात पण,आपला वज्रनिर्धार तसूभर देखील ढळू देत नाहीत, हे या इतिहासाने जगाला दाखवून दिले.

देशाच्या स्वातंत्र्य लढ्यात ज्यांनी प्रत्यक्ष कार्य केले, लाठीमार खाल्ला, तुरुंगवास भोगला, प्रसंगी जे फासावरही चढले अशा वीरांची देशसेवा तर थोर आहेच, परंतु एकीकडे हे युद्ध चालू असताना दुसरीकडे जनमने भारून टाकण्याचे, ती पेटवण्याचे कार्य करणारा एक मोठा वर्ग होता आणि तो म्हणजे कवींचा — गीतकारांचा. प्रभातफेऱ्या, राष्ट्रीय कीर्तने, कलापथके, सार्वजनिक व्यासपीठे, नाटके अशा अनेक माध्यमांमधून या कवींच्या तेजस्वी आणि ओजस्वी रचना सर्वत्र पसरल्या. दिव्याने दिवा पेटवावा त्याप्रमाणे त्या सहस्त्रमुखांमध्ये घोळू लागल्या. या समर आणि स्फूर्तिगीतांना 'लोक-वेदांचे' महत्त्व प्राप्त झाले. सामान्य माणसांच्या मनांत त्यांनी चैतन्याचा स्फुल्लिंग पेटविला. देशभक्तीचे वारे त्यांच्या अंगातून संचारू लागले. एका सुंदर, तेजस्वी आणि निर्भय जाणिवेने सारा समाज भारून गेला. ही किमया प्रामुख्याने या कवींच्या काव्यांनी केली.

ऑगस्ट क्रांतीचा सुवर्ण महोत्सव साजरा करीत असताना भारतीय स्वातंत्र्य आंदोलनातील हे तेजस्वी आणि विजिगीशु शब्द आजच्या शालेय विदयार्थ्यांच्या समोर ठेवण्याची नितांत गरज आहे. या गीतांतून स्वातंत्र्याच्या आंदोलनात ज्यांनी सर्वस्वाचे बलिदान केले अशा स्वातंत्र्य सैनिकांची, त्यांच्या साहस आणि पराक्रमाची माहिती विदयार्थ्यांना व्हावी आणि या उमलत्या मनांना देशभक्ती आणि राष्ट्रप्रेमाचे पुन्हा धुमारे फुटावेत हीच या स्फूर्तिगीतांच्या संकलनामागची मुख्य भूमिका आहे.

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती आणि अभ्यासक्रम संशोधन मंडळाने १९७२ साली इयत्ता १ ली ते ७ वीच्या वर्गातील विदयार्थ्यांसाठी काही स्फूर्तिगीतांचे संकलन प्रसिद्ध केले होते. आज त्या प्रकाशनात थोडी भर घालून हे स्फूर्तिगीतांचे संकलन प्रसिद्ध करण्याचा निर्णय महाराष्ट्र राज्य ऑगस्ट क्रांती सुवर्ण महोत्सव समितीने घेतला आणि तो पूर्णत्वाला जात आहे याचे मला मनापासून समाधान वाटते. ही स्फूर्तिगीते भावी पिढ्यांना राष्ट्रप्रेमाचा संदेश चिरंतन देत राहतील अशी खात्री आहे.

(डॉ. पतंगराव कदम)
माननीय राज्यमंत्री (शालेय शिक्षण)
महाराष्ट्र शासन

# प्रास्ताविक

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळातर्फे इयत्ता १ ते ७ वीसाठी स्फूर्तिगीतांची ही पुस्तिका प्रसिद्ध होत आहे.

ललित साहित्य किंवा काव्य ह्यांचे मानवी जीवनात अपार महत्त्व आहे. उत्तम काव्याच्या वाचनाने आणि गायनाने मन सुसंस्कृत होतेच शिवाय भावना जागृत होऊन मनुष्य योग्य ते कार्य करण्यास प्रवृत्त होतो.

आपण पाहतो, की लहान आणि संस्कारक्षम वयातील मुलांची प्रवृत्ती अनुकरण करण्याची असते. त्यांच्या कानावर ज्या कविता पडतील त्या कविता ते गुणगुणत असतात. म्हणून या मुलांच्या मनोभावनांना योग्य ते वळण लावण्यासाठी आणि त्यांच्यावर चांगले संस्कार करण्यासाठी चारित्र्य, शौर्य, औदार्य, सहानुभूती, देशप्रीती इत्यादी उदात्त गुणांचा आविष्कार करणारी गीते त्यांच्या कानावर पडली पाहिजेत म्हणजे त्यांच्या मनामध्ये इष्ट त्या प्रवृत्तींचा आणि भावनांचा विकास झाल्याशिवाय राहणार नाही.

चांगली गीते एकाने गायली तर जितका परिणाम होतो त्याच्या कितीतरी पटीने अधिक प्रभावी असा परिणाम समूह गायनाने होतो. इतिहासात पोवाडे गायनाने याच सत्याची प्रचीती घडवली होती. सेनापथकाच्या संचलनासाठी (Marching Songs) म्हणून काही स्वतंत्र गीते असतात. त्यांच्या गायनाने वीरोचित भावना उफाळून येतात आणि सामान्य सैनिकही पराकाष्ठेच्या पराक्रमास प्रवृत्त होतात. भारताच्या राष्ट्रीय संग्रामातही अशा राष्ट्रभक्तीपर समूहगीतांनी फार मोठी महत्त्वाची कामगिरी बजावली आहे असे इतिहास सांगतो. थोड्या वर्षांपूर्वी झालेल्या चीनच्या आक्रमणाच्या वेळीही 'जिंकू किंवा मरू' व 'इंच इंच लढवू' यांसारख्या गीतांनी बालकांपासून वृद्धांपर्यंत सर्वांची मने भारून टाकली होती आणि ज्या एकात्मतेसाठी पुढाऱ्यांची अनेक व्याख्याने खर्ची पडत होती त्या एकात्मतेचा उत्स्फूर्त आविष्कार राष्ट्रीय गीतांनी घडवून आणला होता.

या पुस्तिकेत प्रसिद्ध करण्यात आलेल्या गीतांचे निरनिराळ्या प्रसंगी आणि वेळोवेळी 'समूहगान' व्हावे अशी अपेक्षा आहे. मुलांच्या प्रवृत्तींना वळण लावण्याचे गीत हे एक प्रभावी साधन आहे. त्याचा भरपूर उपयोग करून महाराष्ट्रातील मुलांच्या राष्ट्रीय प्रवृत्तींना उधाण आणण्याच्या हेतूने या गीतांचे संकलन केले आहे. या स्फूर्तिगीतांमुळे 'चांदयापासून बांदयापर्यंत'च्या महाराष्ट्रातील विदयार्थ्यांमध्ये राष्ट्रीय भावना जागृत करण्याचा हेतू साध्य होईल.

ही गीते शिकवताना शिक्षकाने खालील सूचना ध्यानात घ्याव्यात :

१. गीतांची चाल सोपी व आकर्षक असावी.

२. जी गीते मोठी आहेत त्यातील म्हणावयास सुटसुटीत अशी कडवी निवडून ती शिकवावीत.

३. शिक्षकाने गीत प्रथम फळयावर लिहावे.

४. विद्यार्थ्यांना ते वाचून दाखवावे व त्याचा अर्थ समजावून सांगावा. नंतर ते गीत दोन वेळा म्हणून दाखवावे.

५. एकेक ओळ शिक्षकाने म्हणावी व विदयार्थ्यांना अनुकरण करण्यास सांगावे.

६. गीताचे शब्द योग्य ठिकाणी तोडले जातील व उच्चार शुद्ध व स्पष्ट असतील यांकडे लक्ष दयावे.

७. गीताची चाल विदयार्थ्यांना नीट समजल्यावर हाताने टाळया देऊन ताल देण्यास शिकवावे.

८. ही गीते शिकवण्याचा क्रम इयत्तावार कसा असावा हे शाळाचालकांनी स्थानिक माहीतगार शिक्षक किंवा अन्य व्यक्तींच्या साहाय्याने ठरवावे. मात्र खालील बारा गाणी सर्व वर्गांस कटाक्षाने शिकवावीत.

| | |
|---|---|
| १. राष्ट्रगीत | ७. जय भारता |
| २. ओम् तत् सत् | ८. जय जय जय शिवराया |
| ३. खरा तो एकची धर्म | ९. मंगलगान |
| ४. बलसागर भारत होवो | १०. मंदीर ये हमारा |
| ५. या भारतात | ११. देश हमारा |
| ६. जय जवान, जय किसान | १२. हमारे जवान |

ह्या स्फूर्तिगीतांतील काही गीते राष्ट्रीय अनुशासन योजनेसाठी संग्रहित केलेल्या गीतांतून उद्धृत केली आहेत. त्यांतील काही कवींची नावे उपलब्ध न होऊ शकल्यामुळे त्यांचा नामोल्लेख करता आलेला नाही.

राष्ट्रीय गीते सामूहिक रीतीने १ ते ७ इयत्तांतील मुलांमुलींना शिकवली व त्यांच्याकडून वेळोवेळी सामूहिक गायन करून घेतले तर प्राथमिक शिक्षणकालापासूनच राष्ट्रीय वृत्तीची जोपासना करण्याचे उद्दिष्ट फलद्रूप करण्यास हा उपक्रम उपयुक्त ठरेल हे निःसंशय आहे.

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका

# १. राष्ट्रगीत

जनगण मन अधिनायक जय हे
भारत भाग्यविधाता ।
पंजाब, सिंधु, गुजरात, मराठा,
द्राविड, उत्कल, बंग ,
विंध्य, हिमाचल, यमुना, गंगा,
उच्छल जलधि तरंग ,
तव शुभ नामे जागे
तव शुभ आशिस मागे,
गाहे तव जय गाथा,
जनगण मंगलदायक जय हे,
भारत भाग्य विधाता ।
जय हे । जय हे । जय हे ।
जय जय जय जय हे ।



## २. ओम् तत् सत्

निरनिराळया नावांनी संबोधिला जाणारा ईश्वर शेवटी एकच आहे अशी या प्रार्थनेची शिकवण आहे.

ओम् असतो मा सद्‌गमय।
तमसो मा ज्योतिर्गमय।
मृत्योर्माऽमृतं गमय।
ओम् तत् सत् श्री नारायण तू पुरुषोत्तम गुरु तू।
सिद्‌ध बुद्‌ध तू स्कंद विनायक सविता पावक तू।
ब्रह्‌म मज्द तू यव्ह शक्ति तू ईश-पिता प्रभु तू।
रुद्र विष्णु तू राम-कृष्ण तू रहीम ताओ तू।
वासुदेव गो-विश्वरूप तू चिदानंद हरि तू।
अद्‌वितीय तू अकाल निर्भय आत्मलिंग शिव तू॥



## ३. श्रीमहाराष्ट्र गीत

महाराष्ट्राची थोरवी या गीतात वर्णिली आहे.

मंगल देशा ! पवित्र देशा ! महाराष्ट्र देशा ।
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ॥ धृ० ॥

राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा ।
नाजुक देशा, कोमल देशा, फुलांच्याहि देशा ।
अंजनकांचनकरवंदीच्या काटेरी देशा ।
बकुलफुलांच्या, प्राजक्तीच्या दळदारी देशा ॥
भावभक्तिच्या देशा, आणिक बुद्धीच्या देशा ।
शाहीरांच्या देशा, कर्त्या मर्दांच्या देशा ॥

ध्येय जे तुझ्या अंतरी
निशाणावरी
नाचते करी ॥
जोडी इहपरलोकांसी
व्यवहारापरमार्थासी
वैभवासी वैराग्यासी ॥
जरिपटक्यासह भगव्या झेंड्याच्या एकचि देशा ॥
प्रणाम घ्यावा माझा हा, श्रीमहाराष्ट्र देशा ॥ १ ॥

—गोविंदाग्रज

## ४. जयोस्तुते

हया गीतात स्वातंत्र्यदेवीचा जयजयकार समर्थ शब्दांत व ओजस्वी भाषेत केला आहे.

जयोस्तुते श्री महन्मंगले शिवास्पदे शुभदे ।
स्वतंत्रते भगवती त्वामहं यशोयुतां वंदे ॥ धृ० ॥

राष्ट्राचे चैतन्य मूर्त तू नीति संपदांची ।
स्वतंत्रते भगवती श्रीमती राज्ञी तू त्यांची ।
परवशतेच्या नभात तूची आकाशी होशी ।
स्वतंत्रते भगवती चांदणी चमचम लखलखशी ॥ १ ॥

गालावरच्या कुसुमी किंवा कुसुमांच्या गाली ।
स्वतंत्रते भगवती तूच जी विलसतसे लाली ।
तू सूर्याचे तेज उदधिचे गांभीर्यहि तूची ।
स्वतंत्रते भगवती अन्यथा ग्रहण नष्टतेची ॥ २ ॥

मोक्षमुक्ति ही तुझीच रूपे तुलाच वेदांती ।
स्वतंत्रते भगवती योगिजन परब्रह्म वदती ।
जे जे उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर ते ते ।
स्वतंत्रते भगवती सर्व तव सहचारी होते ॥ ३ ॥

हे अधम रक्त रंजिते सुजन पूजिते ।
श्री स्वतंत्रते श्री स्वतंत्रते श्री स्वतंत्रते ।
तुजसाठि मरण ते जनन मरण ते जनन ।
तुजवीण जनन ते मरण जनन ते मरण ।
तुज सकल चराचर शरण चराचर शरण ।
श्री स्वतंत्रते श्री स्वतंत्रते श्री स्वतंत्रते ।

– स्वातंत्र्यवीर सावरकर

## ५. बलसागर भारत होवो

ऐक्याच्या बळावरच आपला देश अधिक बलशाली होवो व तो दिवस लवकर येवो अशी इच्छा यात व्यक्त केली आहे.

बलसागर भारत होवो विश्वात शोभुनी राहो ॥ धृ० ॥

हे कंकण करि बांधियले,
जनसेवे जीवन दिधले,
राष्ट्रार्थ प्राण हे उरले,
मी सिद्‌ध मरायाला हो। बलसागर....॥ १ ॥
वैभवी देश चढवीन,
सर्वस्व त्यास अर्पीन,
हा तिमिर घोर संहारिन,
या बंधु सहाय्याला हो। बलसागर....॥ २ ॥
हातात हात घेऊन,
हृदयास हृदय जोडून,
ऐक्याचा मंत्र जपून,
या कार्य करायाला हो। बलसागर....॥ ३ ॥
करि दिव्य पताका घेऊ,
प्रिय भारत गीते गाऊ,
विश्वात पराक्रम दावू,
ही माय निजपदा लाहो। बलसागर....॥ ४ ॥
या उठा करू हो शर्थ,
संपादु दिव्य पुरुषार्थ,
हे जीवन ना तरि व्यर्थ,
भाग्यसूर्य तळपत राहो। बलसागर...॥ ५ ॥
ही माय थोर होईल,
वैभवे दिव्य शोभेल,
जगतास शांति देईल,
तो सोन्याचा दिन येवो। बलसागर...॥ ६ ॥

—सानेगुरुजी



## ६. खरा तो एकची धर्म

कोणालाही तुच्छ न लेखता सर्वांना प्रेम दयावे हाच खरा धर्म आहे असे या कवितेचे सार आहे.

खरा तो एकची धर्म । जगाला प्रेम अर्पावे ॥ धृ० ॥
जगी जे हीन अति पतित
जगी जे दीन पददलित
तयां जाऊन उठवावे । जगाला प्रेम अर्पावे ॥ १ ॥
सदा जे आर्त अतिविकल
जयांना गांजती सकल
तयां जाऊन हसवावे । जगाला प्रेम अर्पावे ॥ २ ॥
कुणा ना व्यर्थ शिणवावे
कुणा ना व्यर्थ हिणवावे
समस्तां बंधु मानावे । जगाला प्रेम अर्पावे ॥ ३ ॥
प्रभूची लेकरे सारी
तयाला सर्वही प्यारी
कुणा ना तुच्छ लेखावे । जगाला प्रेम अर्पावे ॥ ४ ॥
असे हे सार धर्माचे
असे हे सार सत्याचे
परार्थी प्राणही दयावे । जगाला प्रेम अर्पावे ॥ ५ ॥

—साने गुरुजी

## ७. या भारतात

धर्म, जात, अस्पृश्यता हे भेदाभेद नष्ट होवोत व त्याकरता माझे जीवन व्यतीत होवो अशी इच्छा या गीतात प्रगट केली आहे.

या भारतात बंधुभाव नित्य वसू दे ।
दे वरचि असा दे ।
हे सर्व पंथ संप्रदाय एक दिसू दे ।
मतभेद नसू दे ॥ धृ० ॥

नांदोत सुखे गरिब अमिर एक मतांनी ।
मग हिंदु असो ख्रिश्चन वा हो इस्लामी ।
स्वातंत्र्य-सुखा या सकलांमाजि वसू दे
दे वरचि असा दे ॥ १ ॥

सकळांस कळो मानवता राष्ट्रभावना ।
हो सर्व स्थळी मिळुनि समुदाय प्रार्थना ।
उद्योगि तरुण शीलवान येथ दिसू दे ।
दे वरचि असा दे ॥ २ ॥

जातिभाव विसरुनिया एक हो अम्ही ।
अस्पृश्यता समूळ नष्ट हो जगातुनी ।
खलनिंदका मनीहि सत्य न्याय वसू दे ।
दे वरचि असा दे ॥ ३ ॥

सौंदर्य रमो घरघरांत स्वर्गियापरी ।
ही नष्ट होउ दे विपत्ति भीतिबावरी ।
तुकड्यास सदा या सेवेमाजि बसू दे ।
दे वरचि असा दे ॥ ४ ॥

—संत तुकडोजी महाराज

# ८. जय भारता

देशाच्या स्वातंत्र्यासाठी आयुष्य वेचलेल्या क्रांतिकारकांचा आणि वीरांचा जयजयकार या गीतात केला आहे. त्यातून स्वतंत्र भारताचे भवितव्य उज्ज्वल होवो अशी सदिच्छा व्यक्त केली आहे.

जय भारता, जय भारता, जय भारती जनदेवता ॥ धृ० ॥

जय लोकनायक थोर ते, जय क्रांतिकारक वीर ते
जय भक्त ते रणधीर ते, जय आमुची स्वाधीनता
जय भारता जय भारता ॥ १ ॥

तेजोनिधी हे भास्करा, प्रिय पर्वता, प्रिय सागरा
तरुवृक्ष हो हे अंबरा, परते पहा परतंत्रता
जय भारता जय भारता ॥ २ ॥

बलिदान जे रणि जाहले, यज्ञात जे धन अर्पिले
शतकांत जे हृदयी फुले, उदयाचली हो सांगता
जय भारता जय भारता ॥ ३ ॥

ध्वजनील मंडळ हो उभा, गतकाल हा वितरी प्रभा
भवितव्य हे उजळी नभा, दलितांस दाविल तारता
जय भारता जय भारता ॥ ४ ॥

—कुसुमाग्रज

## ९. आमचे निशाण

स्वतंत्र भारताचे समता व विश्वशांतीचे प्रतीक असणारे निशाण नेहमी उंच फडकत ठेवण्यासाठी मृत्यूला न भिता भारतीय जनता लढत राहील, असा विश्वास या गीतात प्रकट केला आहे.

चढवू गगनि निशाण आमुचे
चढवू गगनि निशाण
कोटि मुखांनी गर्जू जय जय स्वतंत्र हिंदुस्थान ॥ धृ० ॥

निशाण अमुचे मनःक्रांतिचे
समतेचे अन् विश्वशांतिचे
स्वस्तिचिन्ह हे युगायुगांचे ऋषिमुख–तेज महान् ॥ १ ॥

मूठ न सोडू जरि तुटला कर
गाऊ फासही आवळला जर
ठेवू निर्भय ताठ मान ही झाले जरि शिर्काण ॥ २ ॥

साहू शस्त्रास्त्रांचा पाउस
आम्ही प्रल्हादाचे वारस
सत्य विदारक आणू भूवर दुभंगून पाषाण ॥ ३ ॥

विराटशक्ती आम्ही वामन
वाण आमुचे दलितोद्धारण
नमवू बळिचा किरीट उद्धट ठेवुनि पादत्राण ॥ ४ ॥

हिमालयासम अमुचा नेता
अजातशत्रू आत्मविजेता
नामे त्यांच्या मृत्युंजय हे चढवू वरति निशाण ॥ ५ ॥

—बा. भ. बोरकर



# १०. जय जवान, जय किसान

श्री. लालबहादूर शास्त्री हे पंतप्रधान असताना जवान व किसान यांचे कार्य सारख्याच महत्त्वाचे आहे अशी घोषणा त्यांनी केली. त्या घोषणेनुसार जवान व किसान यांचा जयजयकार या गीतात केला आहे.

एक सूर, एक ताल, एक गाऊ विजयगान !
जय जवान, जय किसान !!

अखिल देश पाठिशी, 'जवान' व्हा रणी चला
किसान होऊनी कसा, भूमि सस्य श्यामला
यौवनास योग्य रे, शौर्य आणि स्वाभिमान
जय जवान ॥ १ ॥

शत्रु मित्र जाणुनी, सावधान सर्वदा
आपुल्या श्रमे करू, प्रसन्न देवि अन्नदा
उभ्या जगात आपुली, सदैव उंच ताठ मान !
जय जवान ॥ २ ॥

अजिंक्य सैन्य आमुचे, गाजवी पराक्रमा
भूमिदास दाखवी, निर्मितीत विक्रमा
स्वतंत्र हिंद देश हा, स्वतंत्र सिंधु आसमान ।
जय जवान ॥ ३ ॥

—ग. दि. माडगूळकर



## ११. आचंद्रसूर्य नांदो – स्वातंत्र्य भारताचे

भारतातील थोर व्यक्तींचा आणि महान गोष्टींचा उल्लेख करून सत्याच्या पायावर तीच परंपरा येथे निर्माण व्हावी अशी सदिच्छा कवीने व्यक्त केली आहे.

हे राष्ट्र देवतांचे, हे राष्ट्र प्रेषितांचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ धृ० ॥

कर्तव्यदक्ष भूमी, सीतारघूत्तमाची
रामायणे घडावी, येथे पराक्रमाची
शिर उंच उंच व्हावे, हिमवंत पर्वताचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ १ ॥

येथे नसो निराशा, थोड्या पराभवाने
पार्थास बोध केला, येथेच माधवाने
हा देश स्तन्य प्याला, गीताख्य अमृताचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ २ ॥

येथेच मेळ झाला, सामर्थ्य संयमाचा
येथेच जन्म झाला, सिद्धार्थ गौतमाचा
हे क्षेत्र पुण्यदायी, भगवान् तथागताचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ ३ ॥

हे राष्ट्र विक्रमाचे, हे राष्ट्र शांततेचे
सत्यार्थ झुंज घ्यावी, या जागत्या प्रथेचे
येथे शिव-प्रतापी, नरसिंह योग्यतेचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ ४ ॥

येथे परंपरांचा सन्मान नित्य आहे
जनशासनातळींचा पायाच 'सत्य' आहे
येथे सदा निनादो, जयगीत जागृताचे
आचंद्रसूर्य नांदो, स्वातंत्र्य भारताचे ॥ ५ ॥

—ग. दि. माडगूळकर



# १२. सैनिक माझे नाव

सैनिकाच्या अंगी आवश्यक असणाऱ्या गुणांचे वर्णन या गीतातील शेवटच्या दोन कडव्यांत केले आहे. देशकार्य हेच देवकार्य समजावे.

उभा पाठिशी सदैव माझ्या, तेजोमय इतिहास
उभे पाठिशी प्रताप, शिवबा, उभे शौर्य विश्वास,
उभे पाठिशी भगतसिंगजी, उभे गुरू गोविंद
उभा पाठिशी सुभाष योद्धा, गर्जतसे जयहिंद
या देशाचा मी संरक्षक
भारत माझे गाव...सैनिक माझे नाव

मी न मराठी, राजस्थानी, धर्म जाति मम हिंदुस्तानी
मायभूमिचा मी अभिमानी, या अभिमानी धर्मव्रतांचा
अवघ्या अंतर्भाव...सैनिक माझे नाव

जननी माझी भारतमाता, या भूमीतच पिके वीरता
जन्म-मृत्युची मला न चिंता, देह विनाशी, हा तर केवळ
आत्म्याचा पेहेराव...सैनिक माझे नाव

जिंकेन आणी जगेन लोकी, रण क्रीडांगण माझ्या लेखी
खड्ग पडो की मुकुट मस्तकी, देशकार्य ते देवकार्य मज
अढळ अंतरी भाव...सैनिक माझे नाव

उरि निर्भयता, नयनी अग्नी, उन्नत मस्तक करी शतघ्नी
उभा इथे मी असा निशिदिनी, बघू कोणता शत्रू करतो
कुठूनि धीट उठाव...सैनिक माझे नाव

—ग. दि. माडगूळकर

## १३. उचललेस तू मीठ मूठभर

गांधीजींनी केलेल्या मिठाच्या सत्याग्रहाची थोरवी इथे वर्णन केली आहे.

उचललेस तू मीठ मूठभर,
साम्राज्याचा खचला पाया
भारतास का मानवमात्रा
स्फुरणदायि ती दांडीयात्रा
सत्याग्रहि नववीर निघाले
अन्यायाचे मूळ हराया

मिठास होता महाग भारत
तुज मुंगीचे कळे मनोगत
तुझ्या हृदयिचा उठला ईश्वर
दास्यमुक्त हा देश कराया

मीठ त्या क्षणि ठरले अमृत
निद्रित जनता झाली जागृत
नमली सत्ता, सरले शोषण
काय नाव या द्यावे विजया

लोकसेवका, लोकनायका
लोकशक्तिच्या धन्य मांत्रिका
देशोन्नतिचे सत्पथ सारे
भिडती येउन तुझ्याच पाया

—ग. दि. माडगूळकर

## १४. आम्ही भारतीय भगिनी

भारतीय भगिनी कोणत्याही क्षेत्रात काम करू शकतात आणि म्हणूनच त्यांची श्रेष्ठता मानावी असा यातील आशय आहे.

पिढ्यापिढ्यांच्या निर्भय आम्ही, भारतीय भगिनी
घराघरांचे दुर्ग झुंजवू, झुंजू समरांगणी ॥ धृ० ॥

अष्टभुजेच्या वंशज आम्ही, महिषासुर मारू
देवत्वाच्या गुढ्या उभारू, दानव संहारू
वलय होउनी वज्र नांदते, आमुच्या कर कंकणी ॥ १ ॥

रणधीरांच्या सन्निध आम्ही स्फूर्तीसह राहू
रथचक्राच्या आसाठायी घालू निजबाहू
घडवू रामायणे, शत्रुचा मद उतरू रावणी ॥ २ ॥

शस्त्रहि दिसते शोभुन अमुच्या शोभिवंत हाती
भौम मातता चारू त्याला सैन्यासह माती
स्त्रीहट्टाच्या बळे बहरवू स्वर्गसुखे अंगणी ॥ ३ ॥

रणयागांतरी सर्वस्वाच्या आहूती टाकू
अभिमन्यूंच्या बसू रथावर, अश्वाते हाकू
सती उत्तरेपरी आवरू डोळ्यांतच पाणी ॥ ४ ॥

जिजा, अहिल्या, झाशीवाली आमचीच रूपे
सुताऽवतारे जितली युद्धे अमुच्या संतापे
आ-शशितरणी स्वतंत्र राखू भारतीय धरणी ॥ ५ ॥

— ग. दि. माडगूळकर

# १५. ये थोरवी श्रमासी

महात्मा गांधी यांच्या कार्याची थोरवी यात वर्णन केलेली आहे.

हाती धरून झाडू, तू मार्ग झाडलासी
स्पर्शे तुझ्या महात्म्या, ये थोरवी श्रमासी
तण उच्चनीचतेचे, निपटून काढिले तू
तट धर्मकल्पनांचे, उलथून पाडिले तू
दलितांस धीर दिधला, पुशिलेस आसवांसी

माणूस तोच आहे, नांदोत धर्म लाख
मानव्य हीच आहे, समतेस आणभाक
सेवेस लाविले तू, धनवंतही विलासी

साधारणांत रमसी, असुनी महामती तू
अवरुद्‌ध धर्मचक्रा, दिधली पुनः गती तू
धागा परंपरांचा, तरीहि न तोडलासी

—ग. दि. माडगूळकर



# १६. तुला नव्या जगाची आण

नव्या जगात शेतकरी आणि कामकरी यांना महत्त्वाचे स्थान आहे. त्यांच्या परिश्रमांतून देशाचे वैभव वाढणार आहे. म्हणून त्यांना नव्या जगाची आण घालून अधिक श्रम करण्याचे आवाहन केले आहे.

तुझ्या कामामधुन, तुझ्या घामामधुन, उद्या पिकल सोन्याचं रान
चल उचल हत्यार, गड्या होऊन हुषार, तुला नव्या जगाची आण

तुझ्या घणाच्या घावामधुन उठे उद्याच्या जगाची आस
तुझ्या घामाच्या थेंबामधुन पिके भुकेल्या भावाचा घास
तुझ्या ध्यासामधुन, तुझ्या श्वासामधुन, जळे नव्या जगाचं गान
चल उचल हत्यार....

तुझ्या पोलादी टांचेखालुन जित्या पाण्याचे निघतिल झरे
तुझ्या लोखंडी दंडामधून वाहे विजेचि ताकद कि रे
चल मारून धडक, उभा फोडू खडक, आता कशाची भूकतहान
चल उचल हत्यार....

भाग्य लिहिलेलं माझं तुझं घाम आलेल्या भाळावरी
स्वप्न लपलेलं माझं तुझं इथं बरड माळावरी
घेऊन कुदळ-खोरं, चला जाऊं म्होरं, देऊ देशाला जीवनदान
चल उचल हत्यार...

—वसंत बापट



## १७. या रे सारे येथ जमा

देशाची उन्नती करण्यासाठी व देश वैभवशाली बनवण्यासाठी सर्वांनी एका झेंड्याखाली येऊन एकजुटीने प्रयत्न करावा अशी या गीतातील कल्पना आहे.

या रे सारे येथ जमा या झेंड्याखाली
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ धृ० ॥

हिंदु असा मुस्लिम असा, येथे नाही भेद तसा
शिवाजीकुल तर सकलांचे बंधन ना घाली
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ १ ॥

नका माजवू व्यर्थ दुही, काल नका दवडू कलही
संघटनेचा मंत्र जपा, तो अपुला वाली
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ २ ॥

भवतीचे जग उंच चढे, भारत परि पायी चिरडे
करा प्रतिज्ञा, 'भारतभू करु वैभवशाली'
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ ३ ॥

'कलहप्रिय हा हिंदुस्थान,' जग करिते ऐसा अपमान
चला करू या संघटना, या संकटकाली
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ ४ ॥

तनमन अर्पा या कार्या, संघटनाचि तपश्चर्या
उन्नत करुया भारतभू, अवनत जी झाली
बाल असा वा थोर असा या सायंकाली ॥ ५ ॥

—वसंत बापट

## १८. मानव तितुका एकच

जगामध्ये मानव सगळीकडे एकच, मानवधर्म हाच राष्ट्रधर्म समजून तो धर्म आचरावा असे या गीतात सुचवले आहे.

'मानव तितुका एकच आहे, नीच न कोणी, उच्च न कोणी'
हाच आपुला धर्म खरोखर, हीच आपुली शाश्वत वाणी॥ १ ॥

स्वतंत्रतेने मानव राहो, असोत राष्ट्रे स्वतंत्र सारी
पृथ्वीची तर सर्व लेकरे, कोण धनी अन् कोण भिकारी॥ २ ॥

या तरुणांनो वेद जपा हा, जपा जपा हे दिव्य कुराण
हाच अवेस्ता वाचा सारे, वाचा हेची खिरस्तपुराण॥ ३ ॥

पददलितांना उचलुनि घ्या, प्रेमालिंगन द्या दीनांस
पशुत्व सोडुनि मानव व्हारे, नवधर्माचा घ्यारे ध्यास॥ ४ ॥

उन्मत्तांना नमवायाते, खुशाल बांधा ना कमरा
कलह न करिता एकजुटीने लढूनिया जिंकू समरा॥ ५ ॥

आज जगातील धर्मांना या, अधर्मपण हे जणु का आले ?
परस्परांतील भांडण केवळ, स्वधर्म वैभव का झाले॥ ६ ॥

राष्ट्रधर्म हा असे आपुला, मानवधर्मीच हा जाणा
'एकी, शांती, त्याग' असे हा, नवधर्माचा नव बाणा॥ ७ ॥

या धर्माचे दूत होउनी, फिरा फिरा मग विश्वात
सेवा समता संघटनेची दुवाही फिरवा जगतात॥ ८ ॥



— वसंत बापट

## १९. विजयी भारत

भारताच्या निसर्गदत्त देणगीची आणि उज्ज्वल अशा ऐतिहासिक परंपरेची महती यात सांगितली आहे. यातूनच चाळीस कोटी जनतेला स्फूर्ती मिळावी अशी अपेक्षा व्यक्त केली आहे.

विजयी भारत, विजयी भारत, विजयी भारत प्यारा

मुकुट हिमाचल अचल शिरावरि
निर्मल गंगा हृदय स्थलावरि
सागर चाकर पदकमला चुरि
दिशादिशांतुन वाहे जेथे पवित्रतेचा वारा

अशोक, विक्रम, चंद्रगुप्त तव,
प्रताप, गुरुगोविंद, तुझा शिव,
धन्य धन्य भारत तेजार्णव
पूर्वेच्या हृदयातिल उगवे हा जगतोद्दीपक तारा

घे वीरांच्या हृदयाचे गड
त्यागाच्या तोफांची धडधड
प्रीतीच्या झेंड्याची फडफड
जिवंत चाळिस कोटी जळत्या तरवारींच्या धारा.

—विंदा करंदीकर



# २०. झेंडा उंच धरू

सर्वांनी मिळून देश संपन्न, समृद्ध व सुसंस्कृत करून आणि स्वातंत्र्यावर घाला घालणाऱ्यांचा निःपात करून देशाचा झेंडा उंच फडकत ठेवावा.

झेंडा उंच धरू । झेंडा उंच धरू ॥ धृ० ॥

सुवर्णभूमी असुची म्हणती
तीस नांगरू अन्नासाठी
धान्यफळांही करु समृद्ध ती
कष्टा खूप करू ॥ १ ॥

खेडोपाडी भाऊबहिणी
निरक्षर अहा किति अज्ञानी
त्यांना लेखनवाचन शिकवुनि
सौख्या नीट करू ॥ २ ॥

पण कुणि असुच्या स्वातंत्र्यावर
उठता घरचा वा परका तर
बेशक शस्त्रा उपसुन जर्जर
आम्ही त्यास करू ॥ ३ ॥

—वा. गो. मायदेव



## २१. बालक आम्ही आज जरी

लहान मुले म्हणजेच देशाचे भावी शिल्पकार. ही मुले आपल्या पराक्रमाने भारताला कीर्तिशिखरावर नेतील अशी या गीतातील कल्पना आहे.

बालक आम्ही आज सान जरि शिल्पकार देशाचे
मिटलेल्या या बाळमुठीतच धन लपले लाखाचे ॥ धृ० ॥

आज लेखणी अमुच्या हाती
धडे गिरवितो घेउन पाटी
मुखी आमुच्या 'शुभं करोती'
पाढे अन् परवचे ॥ १ ॥

बटुमूर्ती ही आज दिसे जरि
आम्ही शत्रुचे काळ संगरी
पराक्रमा हो अवनी अपुरी
सैनिक भारतभूचे ॥ २ ॥

या स्वच्छंदी वातावरणी
गाऊ स्वातंत्र्याची गाणी
गगनालाही घालू गवसणी
जिंकू शिखर कीर्तीचे ॥ ३ ॥

—आशा लिमये





## २२. चालगीत

मातृपितृतुल्य असलेल्या आपल्या हिंद देशाचे रक्षण करण्यासाठी सर्वांनी सिद्ध असावे ही गीतामधील मध्यवर्ती कल्पना. देशाचे रक्षण करणे हे सर्वांचे आद्य कर्तव्य आहे अशी शिकवण या गीतातून दिली आहे.

हिंददेश हा वंदनीय हा
तिन्ही युगांत वैभवात
चालला पहा ॥

मातृतुल्य हा पितृतुल्य हा
अन्नवस्त्र सौख्य सर्व
पुरविणार हा ॥

भाग्यवान हा विभवशाली हा
पुढे पुढेचि चालला
पुढे पुढेच हा ॥

हिंद बंधु या, हिंद भगिनी या।
हिंद राष्ट्र रक्षणार्थ,
सिद्ध सकल व्हा ॥

— बाळ भोसरकर

## २३. आम्ही शिल्पकार महान

'दृढ प्रयत्नाने असाध्य ते साध्य करून दाखवू' असा विश्वास लहान मुले या गीतात प्रकट करीत आहेत.

जग हे सारे म्हणो अम्हांला सान
आम्ही शिल्पकार हो महान... धृ०

आयुष्याच्या पाषाणातून
घाव टाकिचे अविरत घालुन
शिल्प आमुच्या भवितव्याचे अम्हीच उभवू छान... ॥ १ ॥

रंग ओतुनी कर्तृत्वाचे
अम्ही रंगवू जीवन अमुचे
कुंडलीतल्या असे ग्रहांना अमुचे हे आव्हान... ॥ २ ॥

हात जरी हे लहान दिसती
तेच घडविती थोरशा कृती
याच करांच्या सामर्थ्याने होइल नर भगवान... ॥ ३ ॥

यत्न चिरंतन जेव्हा घडतिल
असाध्य तेही सुसाध्य होईल
मंत्र आम्हांला असे ठाउका यत्न देव तो जाण... ॥ ४ ॥

—सुरेश देशपांडे



## २४. आम्ही उद्याचे कल्पतरू

आम्ही आज लहान असलो तरी तुमच्या काय आकांक्षा आहेत त्या आम्हांला सांगा, आम्ही त्या पूर्ण करू, असा विश्वास लहान मुले या गीतातून प्रकट करीत आहेत.

हे तर इथले अंकुर म्हणुनी
नका अव्हेर करू ॥
आम्ही उद्याचे कल्पतरू हो, आम्ही उद्याचे कल्पतरू ॥ धृ० ॥

आज आमुचे रूप चिमुकले
नाजुक कोमल जरिही दिसते
कणाकणांतून पहा आमुच्या
स्वप्न उद्याचे मधू हासते
रणरणत्या या उन्हात आम्ही अबोल जगावर छत्र धरू ॥ १ ॥

या धरणीचे अमृत पिउनी
सदैव राखू रूप नवे
विसावयाला येतिल येथे
विहंगमांचे नित्य थवे
कवळाया जग उरी प्रीतिने आम्ही आमुचे कर पसरू ॥ २ ॥

ऋतुचक्राचे होतिल फेरे
शिशिराची पण नच भीती
आम्ही नवि जोडू नाती
सुगंध शिंपुन सर्व दिशांतून अक्षय आम्ही आनंद धरू ॥ ३ ॥

काय हवे ते तुम्हांस सांगा
नका असे होऊ कष्टी
आनंदाने कशी हासते
बघा भोवती ही सृष्टी
दुःख कोणते मनात सांगा क्षणी आम्ही ते सर्व करू ॥ ४ ॥

— वसंत वऱ्हाडपांडे





## २५. आमचा झेंडा

ऐक्य व शांतीचे प्रतीक म्हणून आमचा झेंडा सदा फडकत राहो अशी इच्छा या गीतात प्रकट केली आहे.

असाच झेंडा उंच सारखा अभिमानाने फडकू दे
साक्ष आमुच्या स्वातंत्र्याची सर्व जगाला समजू दे ॥ धृ० ॥

इथे न कोणी परका
द्वेषाचा नाही धोका
समतेच्या मार्गावर आम्हां स्थान सत्वरी लाभू दे ॥ १ ॥

स्वातंत्र्यास्तव झटले
वीर इथे जे पडले
स्मृति त्यांची या बलिदानाची आज अम्हांला जाणिव दे ॥ २ ॥

जय बोला क्रांतीची
एकीची नि शांतीची
सर्व धर्म या भारतवर्षी, सौख्य गृहातुन, नांदू दे ॥ ३ ॥

—प. शि. रेडकर

## २६. देश हा अजिंक्य

भारतातील स्फूर्तिस्थानांपासून स्फूर्ती घेऊन आपण देश स्वतंत्र राखू असा निर्धार या गीतात प्रकट केला आहे.

रक्षिण्या हिमालयास आज या
देश हा अजिंक्य हे जगास दावू या ॥ धृ० ॥

विंध्याद्रि सातपुडा जाहले खडे
सह्याद्रि घेत धाव उत्तरेकडे
निद्रित गिरिकुहरि हरी त्यास उठवू या
देश हा अजिंक्य हे जगास दावू या ॥ १ ॥

जलवाहिनी कालिंदी आज सळसळे
गंगालहरींत आज शौर्य संचरे
कृष्णेचे पाणी यशवंत होऊ द्या
देश हा अजिंक्य हे जगास दावू या ॥ २ ॥

ताजमहालातुनिही शब्द थरथरे
चितोडच्या मातीतुनि अग्नि फुरफुरे
छातीचा सिंधुदुर्ग आज उभवू या
देश हा अजिंक्य हे जगास दावू या ॥ ३ ॥

—अनंत धर्माजी कांबळे



## २७. सबै भूमि गोपालकी

आपसांतील भेदभाव विसरून सर्वांनी सर्वोदय होईल असे वागावे असे या गीतात सुचवले आहे.

सबै भूमि गोपालकी
नको कुणाची मालकी
        द्यारे द्यारे वाटून द्या
        यारे यारे वाटून घ्या ॥ धृ० ॥

सूर्य चंद्र नभ वायू लहरी
        झुळझुळणारा जसा झरा
तशी देणगी परमेशाची
        सर्वांकरिता वसुंधरा ॥ १ ॥

धनवंतांनो, भूवानांनो
        अता मालकी तुम्हि विसरा
सेवक भूचे बनुया सारे
        मालक प्रभु तो श्रेष्ठ खरा ॥ २ ॥

नवक्रांतीची ऐका नौबत
        परंपरा संस्कृती स्मरा
हविर्भाग अर्पिण्यास अपुला
        चला उठा रे त्वरा करा ॥ ३ ॥

उच्च नीच मग कुणी न राहील
        सर्वोदय होईल खरा
विश्वशांतिचा नवा यज्ञ हा
        भूदानाने सफल करा ॥ ४ ॥

—राजा मंगळवेढेकर

## २८. प्रिय हा भारत देश

भारतदेश हा आम्हांला प्रिय का आहे याची काही कारणे या गीतात दिली आहेत.

प्रिय हा भारत देश,
अमुचा प्रिय हा भारत देश ॥ धृ० ॥

उंच येथले विशाल पर्वत,
दोन दिशांना सागर गरजत,
सौंदर्याची वनात दौलत,
उदार सरिता इथे वाहती
फुलवित रम्य प्रदेश ॥ १ ॥

मंगल भू ही संत-जनांची,
राम-शिवाच्या पायखुणांची,
नरवीरांच्या समर्पणाची,
दिशादिशांतुन घुमतो येथे
समतेचा संदेश ॥ २ ॥

थोर अजंठ्यातील कला ती,
ताजमहाला जोड न जगती,
स्वर्ग जणू ये भूमीवरती,
पराक्रमाचे गात पवाडे
दुर्गांचे अवशेष ॥ ३ ॥

अनेक भाषा, अनेक भाई,
अनेक वेषांची नवलाई,
परि सर्वांची एकच आई,
एक फुलाच्या विविध पाकळ्या
भेदाचा नच लेश! ॥ ४ ॥

हे देशा, तुज करितो वंदन,
आदरभावे हेलावे मन,
तव चरणी हे वाहू जीवन
अभिमानाने गाउ सदोदित,
'प्रिय हा भारत देश !' ॥ ५ ॥

—वा. ज्यो. देशपांडे





## २९. बालकदिन

स्वतंत्र भारताचे पहिले पंतप्रधान आणि लाडके पुढारी पं. जवाहरलाल नेहरू म्हणजे सत्यशांतीची प्रेमळ मूर्ती आणि मुलांची स्फूर्ती असे कवीने सांगितले आहे.

अम्हांला हवे जवाहरलाल !
जवाहराच्यामुळे भारता–मानिति श्रेष्ठ खुशाल ॥ धृ० ॥
पंचशिलाचे तत्त्व स्विकारुनी
शांति निर्मिली, युद्ध टाळुनी
स्वातंत्र्याचा रथ चालविला– ज्याने सोळा साल ॥ १ ॥

असतिल जगती– लाख पुढारी
आणिक होतिल पुढही परी
जीव आमुचा, जवाहरावर राहिल सालोसाल ॥ २ ॥

सत्य शांतिची– प्रेमळ मूर्ती
फुला मुलांची– एकच स्फूर्ती
जगती कीर्ती मिळवुनी केली स्वर्गावरती चाल ॥ ३ ॥

जवाहराच्या संदेशाला
स्मरू आचरू कर्तृत्वाला
जवाहराच्या चरणांवरती– वाकवु अपुले भाल ॥ ४ ॥

—ना. सी. शास्त्री

## ३०. जय जय जय शिवराया

मराठी राज्याचे तोरण बांधणाऱ्या छत्रपती शिवाजीमहाराजांच्या कर्तृत्वाचे स्फूर्तिदायक वर्णन या गीतात केलेले आहे.

दख्खनच्या हे प्रतापसूर्या जय जय जय शिवराया
मायभूमिच्या महन्मंगला महाराष्ट्राच्या कलिजा
रायगडाच्या राजा देवा सह्याद्रीच्या सरजा
शिवनेरीच्या शिवाजिवाची कुरवंडी तव पाया ॥ १ ॥

दिशादिशांतुनि आज तुझ्यावर तेजाची झिरपणी
नभोदुंदुभी झडती आली ही मंगल पर्वणी
तरंग गाती पुरुषसूक्त हे लोळण घेई दर्या ॥ २ ॥

हृदयाचा बांधला पाळणा जोजविते अंगाई
धन्य जाहली धरती भोळी तुझी मराठी आई
स्वातंत्र्याचे बाळरूप हे कुशीत संगोपाया ॥ ३ ॥

उभा रायगड अभिमानाने उंच उभारूनि माथा
कडेकपारी ती दुमदुमते स्वातंत्र्याची गाथा
दगडा दगडा फुटल्या जिव्हा तुझा पराक्रम गाया ॥ ४ ॥

तूच प्राण अभिमान आमुचा युगपुरुषा शिवराया
सहस्र कंठातुनि प्रभु हे शिवमंगल तुज गाया
महाराष्ट्र जाहले आज हे तुझ्या कृपेची छाया ॥ ५ ॥

जय जय जय शिवराया

—राजा बढे



## ३१. विद्यार्थ्यास

विदयार्थ्यांनी कसे वागावे याबद्दल विदयार्थ्यांना उपदेश केला आहे.

क्षुल्लक कारण धरुनि मनाशी भांडणात तू पडू नको
वर्गबंधुशी वैरभावना मनात कधि तू आणू नको ॥ १ ॥

शाळेमध्ये शिकवित असता गैरवर्तणुक करू नको
आज्ञा आणिक शिस्त नम्रता केव्हाही तू सोडू नको ॥ २ ॥

शक्ति-बुद्धीला धार येऊ दे गर्व परी तू धरू नको
विद्यार्थ्यांच्या जीवनातल्या सातत्याला विसरू नको ॥ ३ ॥

अभ्यासामधि वरचा नंबर काढण्यास तू चुकू नको
विद्यार्थ्यांच्या जीवनातला आनंदहि हा गमवू नको ॥ ४ ॥

—सौ. सुशीला हरिश्चंद्र कशेळकर

## ३२. या रे या रे

भेदभाव विसरून देशासाठी लढण्याची वृत्ती मुलांत निर्माण व्हावी ही या गीतातील भूमिका आहे.

या रे या रे बालजवान देशासाठी घेऊ आण
सैनिक होऊ देशासाठी देशासाठी हो लढणार ॥ धृ० ॥

अमुचा भारत देश हा नाही दुसऱ्या परक्यांचा
जर का कोणी केला हल्ला त्यांना आम्ही परतविणार
देशासाठी हो लढणार ॥ १ ॥

परक्याशी सारे आम्ही कधी न घेऊ आता कट्टी
करुनि एकी घेऊ गट्टी रक्षण देशाचे करणार
देशासाठी हो लढणार ॥ २ ॥

हिंदु, मुस्लिम, शीख, इसाई सगळे आम्ही भाई भाई
भेद विसरुनि एकी करुनि स्वातंत्र्याला हो जपणार
देशासाठी हो लढणार ! ॥ ३

—यशवंत शामराव पाटील



# ३३. मंगल गान

अनेक थोर परंपरा असलेले भारतीय लोकजीवन म्हणजे जणू काही एक मंगल गानच आहे; असे या गीतात अनेक उदाहरणे देऊन कवीने विशद केले आहे.

आमुचे जीवन मंगल गान
आमुचे जीवन, आमुची वाणी, चिरमांगल्यनिधान
फुलांपरी फुलतो, दरवळतो
झऱ्यापरी हसतो, झुळझुळतो
करुणाघन उधळतो जगावर सर्वस्वाचे दान
आमुचे जीवन मंगल गान ॥ १ ॥

तृणाहुनि आम्ही विनम्र, अवनत
हिमालयाहुनि उदात्त, उन्नत
कुसुमाहुन मृदुकोमल असुनी वज्राहुन बलवान
आमुचे जीवन मंगल गान ॥ २ ॥

धर्म आमुचा विश्वबंधुता
कर्म आमुचे शुचिता, समता
परम विरागी असून आम्ही अनुरागाचे प्राण
आमुचे जीवन मंगल गान ॥ ३ ॥

विरुद्ध अमुचा मार्ग हरीचा
जो शूरांचा अन् वीरांचा
ज्वलन आमुची नित्यसाधना विश्वमुक्तिचे वाण ?
आमुचे जीवन मंगल गान ॥ ४ ॥

—मंगेश पाडगांवकर



## ३४. आम्ही सारे नौजवान

शिस्त, सेवा, त्याग, ऐक्य या तत्वांचे पालन
बालवीरांनी करावे असा यातील संदेश आहे.

आम्ही सारे नौजवान बालवीर, आम्ही सारे नौजवान
आम्ही सारे नौजवान बालवीर, सेवा आमुचा प्राण
शिस्त सेवा त्याग, हीच आमुची
प्यारी तत्त्वे जाण,
आम्ही सारे नौजवान बालवीर, आम्ही सारे नौजवान ॥ धृ० ॥

उद्धाराया दलीतलोका वाहू अमुचा काळ
देशावरती प्रीत, हीच ना आहे अमुची चाल
नीच उच्च ही कृत्रिम बंदी तोडुनि टाकू या
नव तरुणांना समान सारे, जगास दावू या
आम्ही सारे नौजवान... ॥ १ ॥

हिंदुस्थानी बच्चे आम्ही मान उंच करणार
वीर कृतीने शाश्वत अमुच्या जगास दिपवीणार
संकटकाळी हासत खेळत ठेवू सत्य जबान
पूर्ण कराया ध्येय आमुचे झगडू देऊ प्राण
आम्ही सारे नौजवान... ॥ २ ॥

यारे यारे नव तरुणांनो, मैत्रीचे घ्या हात
एकी शांती समता सारी येती पाठोपाठ
चारित्र्याने उजळुन टाकू आपण या जगतास
नाही कैसा स्वतंत्र भारत ठेवू एकचि ध्यास
आम्ही सारे नौजवान... ॥ ३ ॥

—शं. ना. जोशी

## ३५. नव्या युगाचे शूर शिपाई

नव्या युगाची गर्जना या गीतात शूर शिपायाने केली आहे.

नव्या युगाचे शूर शिपाई, दुर्दम अमुचा आशावाद
अम्हांस ठावे सदा लढावे, नाही वेळ कराया वाद ॥ १ ॥

खाचा खळगे तुडवू काटे, कसलाही नच हर्ष विषाद
परिस्थितीला देऊ टक्कर, क्रांतीचा घुमवोनी नाद ॥ २ ॥

आम्ही सारे भाऊ भाऊ, समतेची घालोनी साद
जुन्या रुढीच्या रुळल्या वाटा, खुशाल करुनी टाकू बाद ॥ ३ ॥

जपून टाकू पाउल आधी, जगा घालु दे वितंडवाद
अम्हांस पर्वा नसे कुणाची, शमतील सारे व्यर्थ निनाद ॥ ४ ॥

पहा टाकले पाउल पुढती, काय कुणाची असे बिशाद
ललकारोनी करू गर्जना, ध्येय आमुचे झिंदाबाद ॥ ५ ॥

—द. गो. दसनूरकर



## ३६. एक दिलाची सिंहगर्जना

पुराणातील व इतिहासातील उदाहरणे देऊन ऐक्याचे सामर्थ्य या गीतात सांगितले आहे.

एक दिलाची सिंहगर्जना, दिशादिशांतुन घुमते रे
परचक्राची भीति नसे रे, चक्र सुदर्शन फिरते रे ॥ धृ० ॥

सत्यासाठी पांडव लढले
जगावेगळे युद्ध रंगले
महाभारती कृष्ण सारथी, कर्म करावे वदतो रे ॥ १ ॥

सिंहगडावर सिंह झुंजला
पावनखिंडित बाजी पडला
झाशीवाली राणी अमुची, देशासाठी लढते रे ॥ २ ॥

स्वातंत्र्यावर संकट येता
जागृत झाली अवघी जनता
पराक्रमाची शर्थ करूनी, जवान अमुचे लढती रे ॥ ३ ॥

त्याग असा रे अपूर्व अपुला
बलिदानातील रम्य सोहळा
भारतमाता कौतुक करते, ज्योत भक्तिची जळते रे ॥ ४ ॥

—योगेश्वर अभ्यंकर



# ३७. स्वातंत्र्यभूमी

भारतात भाषा, वेष,वर्ण यांत विविधता आढळते. तरी भारतीय लोक हृदयाने एकच आहेत. त्यामुळे भारताचे स्वातंत्र्य शाश्वत राहील असा विश्वास या गीतात प्रकट केला आहे.

ज्या मातीवर आज उभा मी ताठ ठेवुनी मान
आसेतु हिमाचल ही माती, जिचा मला अभिमान
या मातीचा रंग निराळा, निराळाच गंध
रंगागंधामधे वेगळा, एक भावबंध
या मातीची जरी आढळे भिन्न वेशभूषा
हृदयी एक पण, ओठांवरती जरी भिन्न भाषा
कुसुमाहूनहि आहे कोमल, खरी विश्वमाता
वज्राहून पण कठोर होते, वेळ तशी येता
जिंकायाला कोणही येता, अजिंक्य ही ठरते
लाख शिकंदर आक्रमकांना पुरून ही उरते
सूर्य कुणाच्या साम्राज्यावर, कधी न मावळला
तो मावळला या मातीवर, गर्व गळुनी सगळा
या मातीची धरली ज्यांनी, पापी अभिलाषा
ते दुर्योधन मातीत गेले, गेले सर्व विनाशा
या मातीवर खिळले ज्यांचे लाल लाल डोळे
ध्यावे त्यांनी सदैव ध्यानी, काय इथे घडले
मऊ लागली माती म्हणुनि, खणू लागता कोणी
तीक्ष्ण कटाक्षे जाळिल त्याला, स्वतंत्रता राणी
ज्या मातीवर आज उभा मी ती 'असली' माती
या मातीची स्वतंत्रतेची स्वर्गाशी नाती

— पंडित आवळीकर



## ३८. प्रतापशाली, गौरवशाली

शूर आणि महान लोकांचा हा आमचा देश! स्वातंत्र्याचे आणि वैभवाचे प्रतीक म्हणजे आमचा ध्वज! अपमानित जीवनापेक्षा मानाचे मरण हेच आमचे ध्येय!



प्रतापशाली गौरवशाली हे भारतवर्षा
हिमालयाहुन उंच तुझी रे विजिगीषु ईर्षा
कोटिकोटि कंठांतुन उठले एकच जयजयकार
वज्राहुनही अभेद्य आहे स्वतंत्रता संस्कार
धगधगला धमन्यांतुन आता जळजळता अंगार
फेकुनि देऊ परचक्राला उत्तरसीमा पार
विजयी होऊ, तरीच राहू, हीच एक भाषा
इथल्या मातीमधे इमानी वीरांच्या खाणी
जातीजातींतून शिवाजी प्रताप अभिमानी
गृहस्वामिनी इथली बनते झाशीची राणी
भीमथडीची तट्टे प्याली अटकेचे पाणी
जग जिंकावे अध्यात्माने वेदांची भाषा
सिंहावरती बसली आहे मुद्रा देशाची
ध्वजा तिरंगी फडफडणारी अशोकचक्राची
इथली गीता जन्म पावते धनुर्धरांसाठी
गर्भ येथले चक्रव्युहाच्या ऐकतात गोष्टी
मारू अथवा मरू रणांगणि करितो उद्घोषणा

—विहंग

## ३९. शूर हिंद सैनिका !

मातृभूमीच्या रक्षणार्थ सज्ज राहण्याचे आवाहन शूर भारतीयांस या गीतात केले आहे.

शूर हिंद सैनिका चल अता पुढे पुढे
सिद्ध होई शत्रूला चारण्यास रे खडे ॥ धृ० ॥
जाग येई हिमकणा, आग उठे त्यातुनी
दऱ्यांतुनी झऱ्यांतुनी एक गर्जता ध्वनी
सज्ज स्वागता तुझ्या उंच जाहले कडे
रक्षणास हिंदच्या तयार हो हुश्शार हो
अर्पिण्यास सर्वही उदार हो, उदार हो
कोटिकोटि नेत्र हे वेधले तुझ्याकडे
आज सह्य जाहला साह्य त्या हिमाचला
मनामनांतुनी पहा आज अग्नि प्रकटला
पाठिराखी ती भवानी काय तुला साकडे

—एस. ए. शिरगोपीकर



## ४०. हे स्वतंत्र भारता—

ज्या दिवशी अशोकचक्रांकित ध्वज प्रथम फडकला, तो दिवस म्हणजे भारताचा पाडवा होय. त्या दिवसाची महती या गीतात वर्णन केली आहे.

आज घरा परतुनि ये देवता स्वतंत्रता
हाच खरा पाडवा तुझा स्वतंत्र भारता

हा अशोकचक्रांकित
राष्ट्राचा ध्वज पवित्र
फडकत डोले नभात
हृदय ये उचंबळून हर्षभरे पाहता

ध्येयास्तव जे लढले
राष्ट्रवीर आत्मबले
प्राण तुला अर्पियले
थोर हुतात्म्यांचे करि स्मरण ही कृतज्ञता

नौरोजी, टिळक, दास
लाल, जवाहर, सुभाष
तप यांचे ये फळास
राष्ट्रपिता गांधींची होत ध्येयपूर्तता

आज तुझे शिर उन्नत
आज तुझे भाग्य उदित
आज तुझे हृदय मुदित
घोष 'जयहिंद' करू सतत, हीच धन्यता !

—ग. ह. पाटील



# ४१. हे माझे जन्मस्थान

भारताच्या वैशिष्टयांचे वर्णन करून नवभारताचे रक्षण प्राणपणाने करणे आपले कर्तव्य आहे असे कवीने सांगितले आहे.

नव ध्येयाचा नव संस्कृतीचा भारत देश महान
या देशाचे रक्षण करण्या वेचू अपुले प्राण ॥ धृ० ॥
उंच हिमालय, विंध्य, अरवली देशाला अभिमान
सातपुड्याच्या सवे शोभला सह्यगिरी गुणवान ॥ १ ॥
सह्यगिरीच्या दऱ्यादऱ्यांतुनि हिंडुनि जेव्हा याल
मावळातल्या मर्दुमकीला शिर अपुले झुकवाल ॥ २ ॥
गंगा यमुना पवित्र ब्रम्हा गाती कीर्ति महान
सूर मिळविती गोदा, भीमा, कृष्णा मारुनि तान ॥ ३ ॥
प्रीतीचे जो स्मारक ठरला जगात ताजमहाल
वेरुळातली पाहुनि लेणी थक्काचि होउनि जाल ॥ ४ ॥
माथ्यावरि धरि धार जलाची गौरीहर भगवान
पदप्रक्षालन सतत करितसे सागर गाउनि गान ॥ ५ ॥
चंद्रगुप्त अन् प्रतापराणा, शिवराया बलवान
लाल, बाल अन् पाल जन्मले इथेच बापु महान ॥ ६ ॥
तिरंगी झेंडा मम देशाचा माझे स्फूर्तिस्थान
धन्य धन्य मी असा देश हे माझे जन्मस्थान ॥ ७ ॥

—मनोहर जागुष्टे



## ४२. मंदीर ये हमारा !

जातिभेद, पंथभेद, मतभेद, प्रांतभेद व देशभेद विसरून या मानवतेच्या मंदिरात सर्वांना येण्याचे आवाहन संत तुकडोजी महाराज यांनी या गीतात केले आहे.

सबके लिये खुला है मंदीर ये हमारा।
मंदीर ये हमारा॥
मतभेद को भुला है मंदीर ये हमारा।
मंदीर ये हमारा॥
आओ कोओी भी पंथी
आओ कोई भी धर्मी
देशी-विदेशियों का मंदीर ये हमारा
मंदीर ये हमारा॥ १॥

मैदानपर बिछाया। डाला है एक आसन
सब देवता समाता। मंदीर ये हमारा॥ २॥

मानव का धर्म क्या है। मिलती है राह जिसमें
चाहता भला सभी का। मंदीर ये हमारा॥ ३॥

आओ सभी मिलेंगे। समुदाय प्रार्थना में
तुकड्या कहे अमर है। मंदीर ये हमारा॥ ४॥

—संत तुकडोजी महाराज



# ४३. देश हमारा

विविधतेने नटलेल्या भारताच्या उज्ज्वल
संस्कृतीचे वर्णन या गीतात केले आहे.

देश हमारा, देश हमारा, देश हमारा
देश हमारा, निर्मल सुंदर उज्ज्वल गगन का तारा
जिसके बल पर मानवता ने अपना शीश उभारा
देश हमारा, देश हमारा, देश हमारा ॥ धृ० ॥

महागुणी, महाजनी, महाबली विशाल है
जो मित्र पर निहाल है जो शत्रु को कराल है
विक्रान्त भी है शान्त भी है गंगा जिसके भाल है
हिमालय पग जमाये जिसका अटल द्वारपाल है
इसके अर्पण कर दे अपना हम तन मन धन सारा
जिसके बल पर मानवता ने अपना शीश उभारा
देश हमारा, देश हमारा, देश हमारा ॥ १ ॥

हर एक कणपे इस धरा के आज हमको मान है
प्रतीक है पवित्रता का ज्ञान का यह मान है
टागोर का वतन है ये, गांधी का जहान है।
प्रणाम है, प्रणाम है ये अपना हिंदुस्थान है।
प्यार से इसके सजल हुई है अपनी जीवन धारा।
जिसके बल पर मानवता ने अपना शीश उभारा
देश हमारा, देश हमारा, देश हमारा ॥ २ ॥

—न्याय शर्मा



## ४४. हमारे जवान

तळहातावर शिर घेऊन लढणाऱ्या भारतीय
शूर जवानांचा गौरव या गीतात केला आहे.

हमारे जवान ये हमारे जवान
दिलों में जिनके आग है हथेलियों में जान...हमारे... ॥ धृ० ॥

ये चाहें गर तो धूल में भी फूल खिला दें
ये चाहें तो वतन को अपना खून पिला दें
ये चाहें गर तो जुल्म का जहान हिला दें
ये चाहें तो जमीं को आसमाँ से मिला दें
शक्ति शिवा महान की प्रताप की है शान.... ॥ १ ॥

झँडा है इनके हाथ में भारत की शान का
इतिहास दे रहा प्रमाण इनकी आन का
एटम् भडक उठा है आज इनके प्राण का
जवान ये मुकाबला करें जहान का
बापू की है ये आत्मा और नेहरू की जुबान ॥ २ ॥

—भरत व्यास



